**शासकीय तंत्र माध्यमिक शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातील शालेय विषय शिकविणा-या शिक्षकांच्या पदनाम व वेतनश्रेणीबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : व्यशिअ-२०११/(८९/११)/व्यशि-१,**

**मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**

**दिनांक: ०५ फेब्रुवारी, २०१५.**

**संदर्भ :** १) शासन निर्णय क्रमांक : एचएससी-१३७०(२८०३/२०००)/उमाशि-१, मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-३२, दि. ३ जून, २०००.

२) शासन निर्णय क्र.टिएसए-१००३/(३२८७)/व्यशि-४, दि. १७ जानेवारी, २००४.

३ )शासन निर्णय क्र.टिएसए-१००३/(३२८७)व्यशि-४, दि. १९ जुलै, २०१०.

४) शासन शुद्धीपत्रक क्रमांक व्हीओसी-२००९/(१९२/०९)/व्यशि-४, दि.७-४-२०११.

५) शासन अधिसूचना क्रमांक: वेपुर-१२११/प्र.क्र.१४५/सुधारणा-३५/सेवा-९, मंत्रालय, मुंबई-३२, दि.१९ सप्टेंबर, २०११.

**प्रस्तावना :-**

शासकीय तंत्र माध्यमिक शाळेतील व कनिष्ठ महाविद्यालयातील शिक्षक/शिक्षकेत्तर पदांना पाचव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी दिनांक १ जानेवारी, १९९६ पासून लागू करण्यत आलेली आहे. त्यामध्ये पूर्णवेळ शिक्षक, पूर्ण अर्हताधारक पदाला रु. ६५००-१०५०० मूळ व रु.७५००-१२००० वरिष्ठ वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली आहे. पूर्णवेळ शिक्षकांना संदर्भाकित दिनांक १७ जानेवारी, २००४, व १९ जुलै, २०१० च्या शासन निर्णयान्वये दिनांक १ मार्च, २००० पासून रु.७२२५-११०५० मूळश्रेणी रु.८०००-१३५०० वरिष्ठश्रेणी व रु.९१२५-१४०७५ निवडश्रेणी अशी त्रिस्तरीय सुधारित वेतनश्रेणी मंजूर करण्यात आलेली आहे. सदर शासन निर्णयामध्ये शासकीय संस्थेतील शालेय विषय शिकविणा-या अधिव्याख्याता या शिक्षकीय पदाचा स्वतंत्र उल्लेख केलेला नाही.

पदाच्या आढाव्यामध्ये शासकीय तांत्रिक शाळेतील शालेय विषय शिकविणा-या शिक्षकांना अधिव्याख्याता संबोधण्यात आलेले आहे. अशासकीय संस्थेतील व्यवसाय अभ्यासक्रमाकडील कर्मचा-यांना शासनाच्या दि. २७ ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयान्वये ६ वा वेतन आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यात आलेली आहे. तथापि, दि. १७ जानेवारी, २००४ च्या शासन निर्णयामध्ये अधिव्याख्याता या पदाचा उल्लेख नसल्यामुळे सहाव्या वेतन आयोगाच्या शासन निर्णयामधील अधिव्याख्याता या पदास संचालनालयाच्या प्रस्तावानुसार व पदाच्या आढाव्यानुसार रु.५५००-९००० ही वेतनश्रेणी गृहीत धरुन रु. ९३००-३४८०० (४३०० ग्रेड वेतन) दर्शविण्यात आलेली आहे. हया बाबत ज्या

शिक्षकांना रु. ७२२५-११०५० ही वेतनश्रेणी मिळत होती अशा शिक्षकांकडून वसुलीचे आदेश संचालनालयामार्फत निर्गमित करण्यात आले. सदर कर्मचा-यांची वेतनश्रेणी तफावतीची बाब शासनाच्या निदर्शनास आणली. पाचव्या वेतन आयोगाच्या व सहाव्या वेतन आयोगाच्या शासन निर्णयात अधिव्याख्याता ऐवजी पूर्णवेळ शिक्षक (शालेय विषय) (पुरेशी अर्हता) या पदनामाचा स्वतंत्रपणे समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक ५ नुसार वेतनश्रेणीबाबतची अधिसूचना निर्गमित करण्यात आली आहे.

**शासन निर्णय** :

शासनाच्या दि. १७ जानेवारी, २००४ शासन निर्णयामध्ये शासकीय /अशासकीय तंत्र माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळा तसेच दि.२७ ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयामध्ये अशासकीय तंत्र माध्यमिक शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातील शिक्षक, शिक्षकेत्तर कर्मचा-यांना पाचवे वेतन आयोग व सहावे वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना लागू करण्यात आलेली आहे. त्यानुसार, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा व कनिष्ठ महाविद्यालयातील अधिव्याख्यातांना (गणित, रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र, इंग्रजी, मराठी इ.) पदाचे पदनाम पूर्वलक्षी प्रभावाने पूर्णवेळ शिक्षक (शालेय विषय) (पुरेशी अर्हता) असे संबोधण्यात येवून, सदर पदांना पाचव्या व सहाव्या वेतन आयोगानुसार खालीलप्रमाणे वेतनश्रेणी लागू करण्यात येत आहे.

| अनु.क्र. Sr. No. | पदनाम Designation | पाचव्या वेतन आयोगानुसार वेतनश्रेणी | सहाव्या आयोगानुसार वेतनश्रेणी वेतन बँड व ग्रेड पे |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | **अधिव्याख्याता** (गणित, रसायनशास्त्र, भौतिकशास्त्र, इंग्रजी, मराठी इ.) <br> <u>च्या ऐवजी</u> <br> **पूर्णवेळ शिक्षक,** (शालेय विषय) (पुरेशी अर्हता) असे वाचावे. | **दि.१-१-१९९६ पासून** <br> रु.६५००-१०५०० (मूळ श्रेणी) <br> रु. ७५००-१२५०० (वरिष्ठ श्रेणी) <br> **दि.१-३-२००० पासून** <br> रु.७२२५-११०५०मूळ वेतनश्रेणी <br> रु.८०००-१३५०० (वरिष्ठ वेतनश्रेणी) <br> रु.९१२५-१४०७५ (निवडश्रेणी २०% पदांसाठी) | **दि.१-१-२००६ पासून** <br> रु.९३००-३४८००,ग्रेड पे रु.४६००/- (मूळ वेतनश्रेणी) <br> रु.१५६००-३९१०० ग्रेड पे रु.५४००/- (वरिष्ठ श्रेणी) <br> रु.१५६००-३९१०० ग्रेड पे रु.५७००/- (निवडश्रेणी २०% पदासाठी) |

वरील प्रमाणे वेतन निश्चिती करुन देय अनुज्ञेय लाभाची रक्कम देण्याबाबतची कार्यवाही सबंधीत वेळोवेळीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार करण्यात यावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं.१४४/सेवा-९, दि.२५-३-२०११ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२०५१२३४१२३६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shubhangi Suhas Agashe

Digitally signed by Shubhangi Suhas Agashe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shubhangi Suhas Agashe
Date: 2015.02.05 13:03:26 +05'30'

**(शु.सु.आगाशे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-१.
२) संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-१.
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १-२ मुंबई नागपूर.
४) अधिदान व लेखा अधिदान, निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
५) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालये (संचालनालयामार्फत)
७) निवासी लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) वित्त विभाग, मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-३२.
९) शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) सर्व सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/ नाशिक/ पुणे/ नागपूर/ अमरावती/औरंगाबाद.
११) सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय (सह संचालकांमार्फत).
१२) सर्व मुख्याध्यापक, शासकीय अनुदानित तंत्र माध्यमिक शाळा/कनिष्ठ महाविद्यालय (संचालनालयामार्फत).
१३) उच्च व तंत्र शिक्षण विभागातील सर्व व्यशि कार्यासने.
१४) निवड नस्ती.